**संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाच्या अंमलबजावणी संदर्भात असलेल्या नियमामध्ये नवीन नियमाचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.अभियान-१००९/प्र.क्र. ९१/पापु१६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- ३० मे,२००९.**

**वाचा:-** १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.अभियान-१००८/प्र.क्र.१७७/पापु-१६ दिनांक १५ सप्टेंबर २००८.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेचे आरोग्यमान उंचावण्यासाठी सन २०००-२००१ पासून संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान राबविण्यात येत आहे. या अभियानांतर्गत राबविण्यात येत असलेल्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराज स्वच्छ ग्राम स्पर्धेअंतर्गत प्रत्येक स्तरावर मागील वर्षी पुरस्कार मिळालेल्या ग्रामपंचायती पुन्हा त्याच स्तरावर प्रथम, व्दितीय किंवा तृतीय क्रमांकावर येतात. अशा वेळी सदर ग्रामपंचायतींना पुरस्काराची रक्कम द्यावी किंवा कसे याबाबत क्षेत्रीय कार्यालयात अडचणी निर्माण होतात. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियांनातर्गत असलेल्या नियमामध्ये नियम क्रमांक ११ म्हणून पुढील नियम अंतर्भुत करण्यात येत आहे.

**नियम क्र. (११) (अ)**यापूर्वीच्या वर्षातील अभियानात पंचायत समिती, जिल्हा व विभाग स्तरावर बक्षीसपात्र ठरलेल्या ग्रामपंचायतींनी पुढील वर्षी पुन्हा अभियानात जिल्हा परिषद मतदार संघस्तरीय तपासणी फेरीपासून स्पर्धेत सहभागी होणे आवश्यक आहे. तसेच तत्पूर्वी दिनांक २ ऑक्टोबर ते ३१ डिसेंबर या कालावधीत नेमून दिलेल्या मोहीमा राबविणे आवश्यक आहे.

**(ब)** पंचायत समिती, जिल्हास्तरावर व विभागीय स्तरावर यापुर्वीच्या वर्षातील अभियानात मिळालेल्या क्रमांकाच्या **वरचा** क्रमांक चालू वर्षीच्या अभियानात त्याच **स्तरावर** मिळाल्यास अशा ग्रामपंचायतींना यापुर्वीच्या वर्षातील अभियानात मिळालेल्या बक्षीसाची रक्कम, चालू वर्षी मिळालेल्या बक्षीस रकमेतून वजा करून उर्वरित रक्कम बक्षीसरुपाने देण्यात यावी.

**(क)** मात्र वरील ब मध्ये नमूद ग्रामपंचायतींना **त्याच स्तरावर** यापुर्वीच्या वर्षातील अभियानात मिळालेला क्रमांक किंवा त्यापेक्षा निम्न क्रमांक मिळाल्यास असे बक्षीस, त्या ग्रामपंचायतीला न देता पोटनियम ११(अ) च्या अधीन राहून मिळणा-या रकमेएवढे बक्षीस, गुणानुक्रमांकावरील पुढील ग्रामपंचायतीला देण्यात यावे.

**(ड)** मात्र वरील क मध्ये नमूद ग्रामपंचायतींना **त्याच स्तरावर**, यापुर्वीच्या वर्षातील अभियानातील क्रमांकच पुन्हा चालू वर्षातील अभियानात मिळाल्यास, सदर ग्रामपंचायतीस बक्षीसाची रक्कम मिळणार नाही परंतु यापुर्वीच्या वर्षातील अभियानात त्यांना त्याच क्रमांकाचे बक्षीस विभागून मिळालेले असल्यास चालू वर्षी फरकाची रक्कम त्यांना देण्यात यावी. (मात्र ज्या ग्रामपंचायती सतत तीन वर्षे एखाद्या स्तरावरील तोच क्रमांक मिळवित असेल तर चौथ्या वर्षी ती ग्रामपंचायत त्या क्रमांकाच्या बक्षीसाची रक्कम मिळण्यास पात्र ठरेल.)

**(इ)** मात्र या सर्व ग्रामपंचायतींना बक्षीस प्रमाणपत्र देण्यात येईल.

**(फ)** पंचायत समिती, जिल्हा व विभाग स्तरावर बक्षीसपात्र ठरलेल्या शाळा व अंगणवाड्या पुन्हा स्पर्धेत भाग घेवू शकतील. परंतु, त्यांचा पुढील १० वर्षात पुन्हा त्याच स्तरावर क्रमांक आल्यास त्यांना बक्षीस रक्कम मिळणार नाही.

सदर नियम सन २००८-०९ मधील अभियान व त्यापुढील दरवर्षीच्या अभियानासाठी लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०५३०१८३६४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अजितकुमार जैन)

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.

D:\BACKUP 16A\BACK UP - C\Policy Matter\Upload GR\A, B, C, D Ranking GR- 15 Sept. 2008\Add Abhiyan Rule GR. May 2009doc.doc

३) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
४) सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई.
६) सर्व पालकसचिव मंत्रालय, मुंबई.
७) सर्व विभागीय सचिव मंत्रालय, मुंबई.
८) सर्व जिल्हा परिषद अध्यक्ष.
९) सर्व जिल्हा परिषद महिला व बालकल्याण सभापती.
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) महासंचालक माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई.
१३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१४) सर्व उपायुक्त (विकास)
१५) सर्व सहाय्यक आयुक्त (विकास)
१६) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी.(पंचायत)
१७) सर्व जिल्हा माहिती अधिकारी.
१८) सर्व गटविकास अधिकारी (त्यांना विनंती की, सदर शासन निर्णयाच्या छायाप्रती प्रत्येक पंचायत समिती सभापती/उपसभापती, पंचायत समिती सदस्य, सरपंच व ग्रामसेवक याना द्यावी.)
१९) ग्रामविकास विभाग
२०) नियोजन विभाग
२१) वित्त विभाग
२२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
२३) निवडनस्ती.